36

**प्रशासकीय मान्यता -**
**माढा जिल्हा सोलापूर येथे न्यायालयाची इमारत बांधण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
विधि व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.-सीसीबी-३२०९/९४६/प्र.क्र.२०१/का.१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २२ एप्रिल, २०१०.

पहा :-१) प्रबंधक(निरीक्षणे-२, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यु)६०५९/१९९०, दि.३०/११/२००९.
२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, सोलापूर यांचे पत्र जाक्र.प्रशा/ड-१/२००९, दि.९/११/२००९.

शासन निर्णय :- माढा, जिल्हा सोलापूर, येथे न्यायालयाची इमारत बांधण्याच्या रु.२,२६,३५,८७२/- (रुपये दोन कोटी सव्वीस लक्ष पस्तीस हजार आठशे बहात्तर फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रूपये)

| अनु.क्र. | कामाचा तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारतीच्या बांधकामाचा खर्च. | १,७३,६५,४७४ |
| २ | अंतर्गत रस्ता | १,९८,४४० |
| ३ | ४ % आकस्मिक खर्च | ६,९४,६१९ |
| ४ | ८ % पाणी पुरवठा व मल निस्सारण | १३,८९,२३८ |
| ५ | ११ % विद्युतीकरण | १९,१०,२०२ |
| ६ | ५ % किंमतीतील वाढीसाठी | १०,७७,८९९ |
| | एकूण- | २,२६,३५,८७२ |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-
(अ) विस्तृत अंदाजपत्रक करतेवेळी अंतर्गत रस्त्याची मापे छेद नकाशासह अंदाजपत्रकात अंतर्भूत करावी.
(ब) काम सुरु करण्यापुर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी.
(क) मांडणी नकाशा व इमारतीचा सविस्तर नकाशा मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडून मंजूर करुन घेऊनच काम सुरु करावे.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च " मागणी क्र. एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१- कार्यालयीन इमारती-०५१ बांधकाम (०३) न्यायदान-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. **मात्र अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरूवात करू नये.**

कृ.मा.प.

४. हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक :३७८/इमा-२,दि. २९.१२.२००९ आणि वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.चक्र.७०/२००८/विनियम, दिनांक-१५/५/२००९ च्या सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक-१ तसेच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(र. ग. पांचाळ)
कार्यासन अधिकारी

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक, (निरीक्षणे -२) उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, सोलापूर,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र-एक, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र-दोन , नागपूर,
वित्त विभाग (व्यय-६),मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२/अर्थ-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,सोलापूर,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२,सोलापूर ,
(नकाशे व अंदाजखर्चाच्या प्रतीसह )
अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधनिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय भवन,मंत्रालयासमोर,मुंबई--४०० ०३२,
उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, कुर्डुवाडी,
जिल्हा कोषागार अधिकारी,सोलापूर,
उप कोषागार अधिकारी, सोलापूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
कार्यासन ११ व १२, विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती.